व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकी ( Corporate Social Responsibility ) संदर्भात धोरण विहित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सी.एस.आर.-२०१४/प्र.क्र. ८१/अर्थसंकल्प.

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २०१४.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः सीएसआर-२०१४/प्र.क्र. ८१/अर्थसंकल्प, दिनांक १७ जून, २०१४.
२) शासन निर्णय क्रमांकः कायापा-२०१४/प्र.क्र.१९९/आरोग्य-३, दिनांक ३ सप्टेंबर, २०१४.

प्रस्तावना :

कंपनी कायदा २०१३ मधील भाग-१३५ नुसार या नियमांतर्गत काम करण्यासाठी किंवा पूर्वी अस्तित्वात असलेल्या इतर कंपनी कायद्यानुसार विविध कामासाठीच्या खर्चामध्ये कार्पोरेट सामाजिक जबाबदारी (CSR) धोरणानुसार कंपन्यांनी खर्च करणे आवश्यक आहे. सार्वजनिक आरोग्य विभागातंर्गत खालील दर्शविलेले उपक्रम पार पाडले जातात.

१) ग्रामीण जनतेला विशेषत: गरीब व जोखमीच्या लोकांना गुणवत्तापूर्ण आरोग्य सेवा उपलब्ध करुन देणे.
२) प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमातंर्गत माता मृत्यू दर, अर्भक मृत्यू दर व निव्वळ प्रजनन दर यांचे प्रमाण कमी करुन, प्रजनन व बाल आरोग्य चांगल्या दर्जाचे ठेवणे व लोकसंख्येचे स्थिरीकरण करणे.

३) गरीब, दुर्लक्षित तसेच गरजू ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी कार्यक्षम उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने एप्रिल २००५ पासून सुरु करण्यात आलेल्या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आरोग्यावर परिणाम करणाऱ्या महत्वाच्या घटकांचा एकत्रित विचार करुन सदरहु कार्यक्रम केंद्र शासनाच्या मदतीने संपूर्ण राज्यात राबविणे.

व्यावसायिक क्षेत्रात सामाजिक संस्थांचा सहभाग घ्यावयाचा असेल तर या संस्थांना काम करण्यास पूरक असलेल्या क्षेत्रांची उपलब्धता तसेच उपक्रम राबविण्याबाबत कार्पोरेट सामाजिक धोरणानुसार काम करण्यासाठी राज्य शासनाचे निकष काय असावेत याबाबतचा एकत्रित विचार केल्यानंतर यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आलेला आहे.

**शासन निर्णय :**

आरोग्य सेवा अंतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना/कार्यक्रमांतर्गत ज्या विविध वैद्यकीय सेवा उपलब्ध करुन दिल्या जातात त्या सेवेशी निगडित व पूरक अशा क्षेत्रात कार्यरत असणाऱ्या व त्या क्षेत्रात काम करण्यास इच्छुक असलेल्या व्यावसायिक सामाजिक बांधिलकी अंतर्गत (CSR) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखाली असलेल्या योजना/कार्यक्रम राबविण्यासाठी कार्पोरेट सामाजिक जबाबदारी अंतर्गत खर्च करता येईल. मात्र त्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या प्रधान सचिवांची खालील अटींच्या अधिन राहून पूर्वसंमती घेणे आवश्यक असेल.

१) आरोग्य सेवातंर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रम/योजनांच्या माध्यमातून व्यावसायीक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकीअंतर्गत जे प्रस्ताव तयार करण्यात येतील ते प्रस्ताव त्या योजना/कार्यक्रम प्रमुखांमार्फत संचालक, आरोग्य सेवा संचालनालय , आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्याकडे सादर करण्यात यावेत.
२) आरोग्य विषयक योजना/कार्यक्रमाची गरज, प्रस्तावित योजनेतून प्रक्षेपित होणारी निष्पत्ती ( Projected Outcomes ), प्रस्तावित उपक्रमांमुळे स्थानिक समाज व कुटुंबाच्या जीवनमान पध्दतीत काय सुधारणा होईल, तसेच त्यांच्या दैनंदिन घडामोडीमध्ये काय सुधारणा घडून येतील इत्यादी बाबींचे मूल्यमापन करुन प्रस्ताव तयार करण्यात यावेत.

३) व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकीअंतर्गत जे प्रस्ताव तयार करण्यात येतील त्यामध्ये कोणत्या क्षेत्रात कोणते काम होणार आहे, याचा स्पष्ट उल्लेख प्रस्तावात असला पाहिजे.

४) प्रस्तावित भागांमध्ये नवीन तंत्रज्ञानाचा उपयोग व स्थानिक समाज व कुटूंबाच्या परिस्थितीमध्ये सुधारणा घडविणे हा कार्पोरेट सामाजिक जबाबदारी धोरणाचा मुख्य उद्देश असल्यामुळे सदर काम करतांना कंपनीने थेट व्यावसायिक फायदा करुन घेण्यासाठी कोणत्याही प्रकारे सेवांची विक्री किंवा उत्पादनांची विक्री करु नये.

५) सबंधित ठिकाणी कंपनी ना नफा संस्थांसोबत काम करण्यास प्रस्ताव सादर करीत असेल त्या संस्थांची कार्यपध्दती, आर्थिक सक्षमता, राजकीय हस्तक्षेपांपासून दूर व तत्सम बाबींची खातरजमा करण्यात येईल.

६) प्रस्तावास मान्यता देतांना कामाची पुनरावृत्ती ( Duplication ) होणार नाही याची खातरजमा करण्यात येईल.

७) व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकीअंतर्गत जे प्रस्ताव कार्पोरेट क्षेत्रातून प्राप्त होतील त्या प्रस्तावातंर्गत हाती घेण्यात येणाऱ्या उपक्रमांतर्गत प्राप्त होणारी मदत ही प्रामुख्याने वस्तू/सेवाच्या स्वरुपात उपलब्ध करुन घेणे अपेक्षित असून आर्थिक स्वरुपात प्राप्त झालेली मदत/ नगद रक्कम रुग्णकल्याण समितीकडे जमा केली जाईल.

८) व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकी अंतर्गत जे प्रस्ताव प्राप्त होतील त्या प्रस्तावांची संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आयुक्त, कुटूंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान आणि अध्यक्ष, रुग्ण कल्याण समिती यांच्याकडे सादर करण्यात यावेत. प्रस्तावाची वरील निकषाच्या आधारे छाननी करुन ते प्रस्ताव प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना आरोग्य सेवेशी निगडित व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकी संदर्भातील कार्यक्रमाची अंमलबजावणी व ते कार्यक्रम पूर्ण करण्यासाठी त्या कार्यक्रमाचे संनियंत्रण कसे करण्यात येणार आहे या वरील सुस्पष्ट अभिप्रायासह सादर करावेत.

ज्या ठिकाणी सार्वजनिक आरोग्य विभागाकडून एखादा विशिष्ट उपक्रम राज्यातील एखादया भागाकरिता मान्य केला असेल तर तो उपक्रम दुसरे कार्यालय/संस्था राज्यातील दुसऱ्या भागामध्ये राबविता येईल त्याच प्रमाणे ज्या ठिकाणी व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकी अंतर्गत उपक्रम कंपनी मार्फत राबविला जाईल व कंपनीने सार्वजनिक आरोग्य विभागासोबत सामजंस्य करार (MOU)

केला असेल तो उपक्रम राज्यातील इतर ठिकाणी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या पूर्व परवानगीने राबविता येईल.

अनेक औद्योगिक संस्था/कंपन्या/बँका/महामंडळे/अशासकीय संस्था या वरील धोरणातंर्गत प्राथमिक आरोग्य केंद्र व उपकेंद्रांना दत्तक घेण्यास तयार असून त्या अंतर्गत पायाभूत सुविधांचे श्रेणीवर्धन करणे, उपकरणे पुरविणे, कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण देणे, विशेषज्ञांच्या/परिचारिकांच्या सेवा उपलब्ध करुन देणे इत्यादी सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्यास तयार आहेत. तेव्हा सामाजिक दायित्वाच्या प्रकल्प/कार्यक्रम व कार्याची रुपरेषा तयार करुन प्राधान्यक्रम ठरविणे व या विषयावर विविधांगी विचार करणे अपेक्षित आहे. तेव्हा या अंतर्गत विविध कंपन्या/ संस्था/ बँका/ महामंडळे/अशासकीय संस्था या सर्व संस्थांचे कार्यक्षेत्र विचारात घेऊन या संस्थांना नेमक्या कोणत्या कार्यक्षेत्रात रस आहे या विषयीचा आढावा घेऊन त्या संस्थांबरोबर स्थानिक लोकप्रतिनिधी/तालुका अधिकारी व त्याच प्रमाणे शासकीय आरोग्य संस्थांचे सबंधित अधिकारी यांनी बैठका आयोजित करुन शासकीय आरोग्य संस्थांच्या सौंदर्यीकरण व बळकटीकरणासाठी या संस्थांना सहभागी करुन घेण्याबाबत रुपरेषा ठरविण्यात यावी. व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकी (Corporate Social Responsibilities ) खाली आरोग्य उपक्षेत्रातंर्गत कोणते उपक्रम/कार्यक्रम हाती घेता येण्यासारखे आहेत त्याची उदाहरण म्हणून परिशिष्ट "अ" मध्ये यादी जोडलेली आहे.

कंपन्यासोबत करण्यात येणारे करारपत्र ( MOU) विभागाच्या प्रधान सचिवांच्या पूर्वमान्यतेने संचालक, आरोग्य सेवा संचालनालय करु शकतील व त्यांच्या अंमलबजावणी संदर्भातील जबाबदारी शासनाच्या वतीने संचालकांची राहील. तसेच अंमलबजावणीसंदर्भात प्रत्येक तीन महिन्यांनी प्रगती अहवाल संचालक, आरोग्य सेवा संचालनालय शासनास सादर करतील.

राबविण्यात आलेल्या व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकीशी संबंधित कार्यक्रमाची पोषकता ( Sustainability ) सहाय्यभूत ( Enable ) होण्यासाठी कार्यवाहीचे आयोजन करुन त्या कार्यवाहीची अंमलबजावणी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय यांच्या मार्फत होणे आवश्यक आहे.

सामाजिक/स्थानिक स्तरावरच्या आरोग्य विषयक गरजा आणि व्यावसायिक क्षेत्रातील सामाजिक बांधिलकी हितसबंध ( CSR Interest ) मध्ये अनुरुप असा समतोल साधण्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांच्यावर असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११०११३०२३२२२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KOLEKAR TATOBA M

Digitally signed by KOLEKAR TATOBA M
DN: CN = KOLEKAR TATOBA M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = PHD
Date: 2014.11.01 18:14:45 +05'30'

**( ता. मा. कोळेकर )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी सोसायटी, मुंबई.
संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा ( कु.क. ) पुणे.
उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
सर्व अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
सह संचालक, ( हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग ), पुणे.
सह संचालक, ( कुष्ठरोग व क्षयरोग ), पुणे
उप संचालक, परिवहन, पुणे
सर्व उप संचालक, आरोग्य सेवा
सहाय्यक संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई.
सर्व जिल्हा शल्य चिकित्सक,
सर्व आरोग्य अधिकारी,
कक्ष अधिकारी/अवर सचिव/ उप सचिव ( सार्वजनिक आरोग्य विभाग )
निवड नस्ती ( अर्थसंकल्प )

शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. सी.एस.आर.-२०१४/प्र.क्र. ८१/अर्थसंकल्प,
दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१४ चे सहपत्र

# परिशिष्ट " अ "

## CSR for Health
## An Invitation for Partnerships

The State through Department of Health and Family Welfare has been investing substantial resources in improving the quality of health services for the people of Maharashtra. However there is a need for partnerships with private sector bodies and NGOs to supplement govt. efforts. The contribution of corporate bodies in strengthening infrastructure, human resources, capacity building, and monitoring systems can be of vital importance in achieving health objectives as they will be complimentary to the overall functioning of the department. Many companies and corporate bodies have already shown their willingness to support the govt. through their Corporate Social Responsibilities (CSR) mandate; however there is a need to create a framework to channelise corporate efforts into the desired areas and identified gaps in the health sector.

**Examples of CSR activities :**

**Infrastructure :**

- Upgrading facilities in labour rooms and operation theatres at delivery points where there is a large number of deliveries. This would include sub-centres which generally have poor facilities.
- Upgrading infrastructure with regards to provision of 24x7 electricity, solar- powered or other refrigeration support for immunization and storage, and clean water in delivery rooms, blood banks and SNCUs in the District Hospitals (DH), Sub-District Hospitals (SDH) and Rural Hospitals (RH).
- 'Adoption' of PHCs (Primary Healthcare Centers) : Upgrading infrastructure of PHCs and sub- centres including repairs of toilets, staff quarters, roof leakages, solar water heaters, providing PICO projectors for showing educational videos etc.
- Providing support in filling up the various gaps identified by the health dept. under its 'Call to Action' programme.
- Upgrading NBCC (New Born Care Corner) by providing warmers and new born referral care kits.

- Providing new low cost diagnostics equipment.
- Upgrading, repairs and maintenance of medical equipment. Training of staff in proper use of available medical equipment.
- Providing extra staff for support of regular staff at facilities where the work load and patient burden is high.

**Programme related activities :**

- Support for implementation of RKSK (Rashtriya Kishori Swasthya Karyakram) program.
- Support for implementation of RMNCH+A (Reproductive, Mother, Neonatal, Child Health, Adolscence) program. Strengthening ASHA’s for implementation of the program, including tracking weight gain and Hb during pregnancy, and providing nutrition and health counceling.
- Support for reduction of NMR (Neonatal Mortality Rate) in the state.
- Supporting implementation of WIFS (Weekly Iron Folic Acid Supplementation) program; helping in achieving convergence between health dept, education dept., urban education dept., and ICDS (Integrated Child Development Scheme) functionaries.
- Supporting Health dept. in 'demand generation' and raising awareness for contraception/ spacing methods eg. promoting IUCD (Intrauterine Contraceptive Device) (Like Cu-T, mirena).

**System related activities (soft component) :**

- Support for developing IEC (Information Education and Communication) and BCC (Behaviour Change Communication) material e.g. producing educational videos.
- Support for regular compiling and processing of state, district and sub- district level health statistics on outcome and performance indicators, based on the department's needs.
- Support in training activities specially for improving diagnostic skills and conducting tests.
- Partnerships with IMA(Indian Medical Association), IAP (Indian Association of Pediatricians), MCIM (Maharashtra Council of Indian Medicine) and other medical associations.
- Support in developing training modules for improving counseling and communication skills of MOs (Medical Officer) and nursing staff etc.

- Conducting training programmes for private practitioners for updating their knowledge in new guidelines such as IYCN (Infant and Young Child Nutrition) practices and providing information about govt. programs and schemes, so that they can guide their patients to take benefit of these schemes.

**Research related activities**

- Piloting innovative initiatives and scaling up of pilots.
- Developing and certifying 'baby friendly hospitals' in the state by collaborating with BPNI. These hospitals should ensure that all the requirements of a 'baby friendly hospital' should be fulfilled, and breast feeding should start within 1/2 hour of birth.
- Pilot projects for increasing male involvement in family planning and contraceptive /spacing methods by using educational videos or other means.
- Research Trials for tackling issues Anemia in adolescence and pregnant women.

-------xx--------